**नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोत (अपारंपरिक ऊर्जा स्त्रोत) यापासून वीजनिर्मितीच्या पारेषण संलग्न प्रकल्पांसाठी एकत्रित धोरण-२०१५ मध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपाऊ-२०१६/प्र.क्र.११०/ऊर्जा-७.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३ डिसेंबर, २०१६.

वाचा:-

१) शासन निर्णय क्रमांकः अपाऊ-२०१५/प्र.क्र.४९/ऊर्जा-७, दि.२०.०७.२०१५.
२) शासन निर्णय क्रमांकः अपाऊ-२०१५/प्र.क्र.४९/भाग-८/ऊर्जा-७, दि.०९.०९.२०१५.
३) मा.मंत्रीमंडळ निर्णय,दिनांक २९.११.२०१६.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय दि.२०.०७.२०१५ अन्वये, नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोतांपासून वीजनिर्मितीच्या प्रकल्पांना प्रोत्साहन देण्यासाठी राज्य शासनाने नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोत (अपारंपरिक ऊर्जा स्त्रोत) यापासून वीज निर्मितीच्या पारेषण संलग्न प्रकल्पांसाठी एकत्रित धोरण-२०१५ जाहीर केले आहे.

सदर शासन निर्णयामधील तरतूदीनुसार, ५००० मे.वॅ. क्षमतेचे पवनऊर्जेपासून वीजनिर्मितीचे प्रकल्पांसाठी उद्दिष्ट निश्चित केले आहे. त्याअंतर्गत, १५०० मे.वॅ. क्षमतेचे RPO पूर्ण करण्यासाठी व उर्वरित ३५०० मे.वॅ. क्षमतेचे पवनऊर्जेपासून वीजनिर्मितीचे प्रकल्प विकासकाकडून राज्याबाहेर स्वयंवापर /समूह स्वयंवापर (captive use) यासाठी किंवा राज्याबाहेर तिसऱ्या घटकास वीज विक्री करण्यासाठी किंवा नूतनशील ऊर्जा प्रमाणपत्र (Renewable Energy Certificate/REC) या मार्गाने विकसित करण्यात येणार होते. या तरतुदीमध्ये खालीलप्रमाणे अंशत: सुधारणा करण्यात येत आहे:-

| दिनांक २०-०७-२०१५ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २.६ मधील तरतूद | सुधारीत तरतूद |
|---|---|
| **कलम २.६** - या धोरणांतर्गत ३५०० मे.वॅ. क्षमतेचे पवनऊर्जेपासून वीजनिर्मितीचे प्रकल्प विकासकाकडून राज्याबाहेर स्वयंवापर / समूह स्वयंवापर (captive use) यासाठी किंवा राज्याबाहेर तिसऱ्या घटकास वीज विक्री करण्यासाठी किंवा नूतनशील ऊर्जा प्रमाणपत्र (Renewable Energy Certificate) च्या मार्गाने विकसित करता येतील. त्यासाठी त्यांना संबंधित वीज नियामक आयोगाच्या नियमावलीनुसार राज्याबाहेरील खुला प्रवेश देण्यात येईल. | २.६.१- परिच्छेद २.६ मध्ये अंशत: बदल करुन या धोरणांतर्गत खुला प्रवेशअंतर्गत उपलब्ध असलेल्या एकूण ३५०० मे.वॅ. क्षमतेपैकी ५०० मे.वॅ. क्षमतेचे पवनऊर्जेपासून वीजनिर्मितीचे प्रकल्प राज्यात स्वयंवापर (captive use) किंवा राज्यात समूह स्वयंवापर (group captive use) किंवा राज्यात तिसऱ्या घटकास वीजविक्रीसाठी विकसित करता येतील किंवा नूतनशील ऊर्जा प्रमाणपत्राच्या (Renewable Energy Certificate) च्या मार्गाने विकसित करता येतील. त्यासाठी त्यांना राज्य वीज नियामक आयोगाच्या नियमावलीनुसार राज्यात खुला प्रवेश देण्यात येईल.<br>• उर्वरित ३००० मे.वॅ. क्षमतेचे पवनऊर्जा प्रकल्प संदर्भ क्रमांक (१) च्या शासन निर्णयाप्रमाणे विकसित करता येतील. |

परिच्छेद क्रमांक २.६.२- राज्यातील सर्व वीज परवानाधारक कंपन्यांना त्यांच्या वीज खरेदीच्या प्रमाणात महाराष्ट्र वीज नियामक आयोगाने वेळोवेळी निश्चित केलेल्या नित्यनूतनशील ऊर्जा खरेदी बंधनानुसार नित्यनूतनशील ऊर्जा खरेदी करणे बंधनकारक राहील.

३. ६.३.१ मध्ये अंशत: बदल करण्यात येत आहे:-

महानिर्मिती कंपनीला सौर ऊर्जेचे २,५०० मे.वॅ.पैकी ५०० मे.वॅ. क्षमतेचे प्रकल्प EPC (Engineering Procurement & Construction ) या तत्त्वानुसार विकसित करुन त्यांनी निर्माण केलेली वीज महावितरण कंपनीद्वारा खरेदी करण्यात येईल.

४. परिच्छेद क्रमांक ६.३.२- राष्ट्रीय वीज धोरण (National Tariff Policy-२०१६)नुसार सौर ऊर्जेद्वारे वीज खरेदी करण्याचे बंधन ८% पर्यंत करण्याचे जाहीर करण्यात आलेले आहे. त्यानुसार, सदर धोरण राज्यातही लागू करण्यात येईल.

वरील सुधारणेप्रमाणे कार्यवाही करताना सदर पवनऊर्जा प्रकल्पांना उपरोक्त संदर्भाधीन दिनांक ०९-०९-२०१५ च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेली कार्यपध्दती लागू राहील. तसेच, सदर पवन ऊर्जा प्रकल्पांची नोंदणी करताना प्रकल्पधारकांनी दिलेल्या वीज विक्रीच्या पर्यायानुसार नोंदणी करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०५१२५५४५५८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rohini P Jadhav

Digitally signed by Rohini P Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOURS DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=12646d8130730515a2533ddd2b46b2c82ca9b32dbbcd3d60f21e82f7cc2ee090, cn=Rohini P Jadhav
Date: 2016.12.05 13:00:00 +05'30'

**( रो.प्र.जाधव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (ऊर्जा, नवीन व नवीकरणीय ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
४. अप्पर मुख्य सचिव (वित्त), महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई .
५. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ - सूत्रधार कंपनी मर्यादित.
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित.
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित.
११. सर्व परवानाधारक कंपन्या.
१२. सर्व मंत्रालयीन विभाग.
१३. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (ऊर्जा-७ कार्यासन), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

******